**मुख्यमंत्री सुकर्मी पुरस्कार योजना विभाग रत्न म्हणून पुरस्कार्थीची निवड करण्यासाठी निवड समिती गठीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थापना- ०४१८/प्र.क्र.९९ /पाच,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :-** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.४३२/का.१२, दिनांक २०.०३.२०१८

**प्रस्तावना :-**

प्रशासनात उत्कृष्ट काम करण्याऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना त्यांची कर्तव्ये सक्षमपणे व पूर्ण क्षमतेने पार पाडण्यासाठी प्रेरणा देऊन त्यांचे मनोधैर्य उंचावण्यासाठी पुरस्कार देऊन गौरव करण्यासाठी “मुख्यमंत्री सुकर्मी पुरस्कार योजना” ही अभिनव योजना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी प्रथमत: मंत्रालय स्तरावर कार्यान्वित करण्यात येत आहे. त्याअनुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदीनुसार प्रशासकीय विभाग स्तरावर देण्यात येणाऱ्या “विभाग रत्न पुरस्कार” साठी संसदीय कार्य विभागातील गुणांकनानुसार पात्र अधिकारी/कर्मचारी यांच्यामधून विभाग रत्न म्हणून पुरस्कार्थीची निवड करण्यासाठी संसदीय कार्य विभागाच्या स्तरावर निवड समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मंत्रालयीन प्रशासकीय विभाग स्तरावर देण्यात येणाऱ्या “विभाग रत्न पुरस्कार” साठी संसदीय कार्य विभागातील पात्र अधिकारी / कर्मचारी यांच्यामधून विभाग रत्न म्हणून पुरस्कार्थीची निवड करण्यासाठी संसदीय कार्य विभागाच्या स्तरावर पुढीलप्रमाणे निवड समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव/ सचिव, संसदीय कार्य विभाग | अध्यक्ष |
| २. | सह सचिव / उपसचिव, संसदीय कार्य विभाग | सदस्य |
| ३. | अवर सचिव (आस्थापना), संसदीय कार्य विभाग | सदस्य - सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०८१२३८४३३५१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Tikamdas N. Shikharame
Date: 2018.08.08 12:43:06 +05'30'

**( टि. न. शिखरामे )**
कार्यासन अधिकारी, संसदीय कार्य विभाग

**प्रति,**

१. मा.राजपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
३. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
५. मा. मंत्री संसदीय कार्य, यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव
७. सर्व सन्माननिय सदस्य, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक (सर्व विभाग)
९. सचिव, संसदीय कार्य विभाग यांचे स्वीय सहायक
१०.उपसचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११.अवर सचिव/सर्व कक्ष अधिकारी, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२.सर्व समिती सदस्य.
१३.निवडनस्ती